सन २०१८-१९ या वित्तिय वर्षात राष्ट्रीय रुरबन अभियानांतर्गत केंद्र शासनाकडून प्राप्त झालेला निधी आहरित करण्याबाबत .

महाराष्ट्र शासन

**ग्राम विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः रुरबन-२०१८/प्र.क्र.१२२/योजना-१**

बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ,

फोर्ट, मुंबई - ४०० ००१

दिनांक : ३० नोव्हेंबर, २०१८

**वाचा :**

१) या विभागाचा शासन निर्णय क्रमांक एनआरएम २०१६/प्र.क्र.०१/योजना-४ दि.१४ जानेवारी २०१६

२) केंद्र शासनाचे निधी वितरण आदेश क्र.जे-१००११/१६/२०१६-रुरबन(*Sl.No.26*) दि. २० जुलै,२०१८

**प्रस्तावना :**

केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय रुरबन अभियान संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये राज्यात सुरु करण्यात आलेले आहे. राष्ट्रीय रुरबन अभियानांतर्गत तीन टप्प्यातील गावसमुहांची निवड झालेली असुन तालुका व जिल्हा स्तरावर रुरबन अभियानाची यशस्वीरित्या अंमलबजावणी सुरु आहे. सन २०१८-१९ या वित्तिय वर्षासाठी सदर अभियानांतर्गत तिस-या टप्यातील ८ गावसमुहांसाठी गावसमुह आरखडा व इतर प्रशासकीय खर्च याकरीता २ % प्रशासकीय निधींतर्गत रक्कम रु २.८० कोटी केंद्र शासनाकडून उपलब्ध करुन देण्यात आलेला आहे. सदरचा निधी कोषागारातून आहरित करुन राज्याच्या रुरबन मिशन महाराष्ट्र शासन या बचत खात्यामध्ये २ % प्रशासकीय निधीकरीता जमा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय :**

राष्ट्रीय रुरबन अभियानांतर्गत तिस-या टप्प्यातील ८ गावसमुहांसाठी गावसमुह आरखडा व इतर प्रशासकीय खर्च याकरीता २ % प्रशासकीय निधींतर्गत केंद्र शासनाकडून उपलब्ध करुन देण्यात आलेला रक्कम रु २.८० कोटी इतका निधी कोषागारातून आहरित करण्याकरिता मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, पालघर यांना अर्थ संकल्पीय वितरण प्रणाली वर “मागणी क्र.एल-३, २५१५, इतर ग्राम विकास कार्यक्रम, १०६, ग्रामिण भागातील नागरी सुविधांसाठी तरतूद, (००) (०१) राष्ट्रीय रुरबन अभियान गावसमुहांचा विकास (केंद्र हिस्सा ६०%), ३१ सहाय्यक अनुदाने, (२५१५२५३९)” या लेखाशिर्षांतर्गत उपलब्ध करुन देण्यांत येत आहे.

२. सदरची रक्कम कोषागारातून आहरीत केल्यानंतर या विभागाच्या राष्ट्रीय रुरबन अभियानाच्या राज्यस्तरावर उघडण्यात आलेल्या खालील बचत खात्यात जमा करण्यात यावी.

| बेंकेचे नाव व शाखा | खात्याचा क्रमांक | खात्याचे नांव | NEFT/IFSC Code |
|---|---|---|---|
| बॅंक ऑफ महाराष्ट्र, शाखा- मंत्रालय, मुंबई | ६०२४२९९०९२४ | रुरबन मिशन महाराष्ट्र | MAHB०००१३८८ |

३. सदर शासन निर्णय वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक विअप्र- २०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२ दिनांक १७ एप्रिल, २०१५ अन्वये तसेच वित्तीय अधिकार नियम पुस्तिका - १९७८ भाग-एक, उप विभाग - तीन अनुक्रमांक चार परिच्छेद क्रमांक २७(२) अन्वये प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय प्राधिकारान्वये तसेच वित्त विभाग शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं- २०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दिनांक ०२ एप्रिल, २०१८ मधील अटी व शर्तींची पूर्तता होत असल्याने निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक 201811301539078920 असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dr. Vasant Gopal Mane

Digitally signed by Dr. Vasant Gopal Mane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Rural Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=19c1f05a32104713094b1babbae721a60140a8f1f9e16ca9d8dc3eaf7de15d65, cn=Dr. Vasant Gopal Mane
Date: 2018.12.10 13:29:43 +05'30'

**डॉ. वसंत माने**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल, (लेखा परिक्षा) व (लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई
२. मुख्य कार्यकारी अधिकारी, जि. प. तथा अध्यक्ष, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, पालघर
३. प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, पालघर
४. जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा पालघर
५. नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
६. वित्त विभाग (व्यय-१५) व (अर्थ -१७) मंत्रालय, मुंबई ४०० ००३२
७. कार्यासन अधिकारी, वित्त-१ / योजना-२, ग्रामविकास विभाग.
८. निवडनस्ती.